**वसुंधरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), जि. अमरावती या संस्थेचा भूखंड गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक ३४२३/ प्र.क्र.१७९७/१९-स**

हौसिंग सेल, कुशेश मेन्शन, दुसरा मजला, २२ कावसजी पटेल मार्ग,
जन्मभूमी मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :-**
१. शासन निर्णय क्र.एचएसजी-१०९५/प्र.क्र.१२१४/ पहिला/१८-सी, दि. ०५.०७.१९९७
२. शासन निर्णय क्र.एचएसजी-१०९५/प्र.क्र.१२१४/दुसरा /१८-सी, दि. ०४.०९.१९९८
३. शासन निर्णय क्र.एचएसजी-१३.०५/प्र.क्र.६७/तिसरा वाढीव/१८-सी, दि.०३.०३.२०००
४. संस्थेचा प्रस्ताव जा.क्र. ०२, दिनांक ०१.१०.२०२३.
५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अमरावती यांचे पत्र जा.क्र. जिउनिअम/वि-२/गृह/ वसुंधरा/२९१२/२०२४, दि. २८.०६.२०२४.

**प्रस्तावना :-**

वसुंधरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.),जि. अमरावती या संस्थेतील एकुण १५ पात्र सभासदांना संदर्भाधिन शासन निर्णय क्र. १, २, ३ अन्वये एकूण कर्ज रुपये १८,३५,९७६/- (रुपये अठरा लाख पस्तीस हजार नऊशे शहात्तर फक्त) इतके वितरित करण्यात आले होते.

संदर्भ क्र. ४ अन्वये संस्थेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच सर्व १५ कर्जदार सभासदांना वितरीत केलेली कर्जाची रक्कम त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे. तसेच सर्व सभासदांना निर्गमित केलेल्या ना-देय प्रमाणपत्रांवरुन व या कार्यासनातील खतावणीमधील नोंदीवरुन संस्थेला दिलेले कर्ज व्याजासह वसुल झाल्याचे दिसुन येते. संस्थेकडे शासनाचे येणे बाकी नसल्यामुळे संस्थेचा भूखंड गहाणखतातून मुक्त करण्याचा संस्थेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -:**

वसुंधरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.),जि. अमरावती या संस्थेच्या एकूण १५ सभासदांना वितरीत करण्यात आलेले गृहबांधणी कर्ज रुपये १८,३५,९७६/- (रुपये अठरा लाख पस्तीस हजार नऊशे शहात्तर फक्त) व त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे. सबब, सदर संस्थेकडून शासनाचे कोणतेही येणे बाकी नसल्याने संस्थेने शासनाकडे गहाण ठेवलेला गहाणखतामध्ये नमुद केलेला अमरावती महानगरपालिकेच्या हद्दीतील मौजा नवसारी, प्र.नांदगांवपेठ, ता. अमरावती जि. अमरावती येथील सर्वे नं. ३२/१-अ मधील एकूण ० हेक्टर -७४ आर जमिनीवरील एकूण १२ प्लॉट्स चे क्षेत्रफळ

३५७०.०२ चौ.मी. असलेला भूखंड शासनाकडे गहाण ठेवलेला आहे. सदर चतु:सिमा खालीलप्रमाणे असून सदर भूखंड व त्यावरील बाधकांम गहाणखतातून मुक्त करण्यात येत आहे.

**पुर्वेकडे : सर्व्हे नं. ३२ ची जमीन**

**पश्चिमेकडे : दुस-यांचे लेआऊट**

**उत्तरेकडे : लेआऊट मधील ७.५० मिटर रुंदीचा रस्ता**

**दक्षिणेकडे : लेआऊट मधील ७.५० मिटर रुंदीचा रस्ता**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२८११५८१२१८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI

Digitally signed by VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f8392d872b7180812a91876993d519e95c3e41444d8d93ecaac6a9b51c69838f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0422C17B24964BFB1F10270074369C4888C02315C6A4C050EAA332B556F90EA, cn=VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI
Date: 2025.02.28 11:59:52 +05'30'

**( विजया संगशेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य मुंबई-०१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), (२ प्रती)
२) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य नागपूर-०२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), (२ प्रती)
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था पुणे.
६) संचालक, विमा संचालनालय, मुंबई गृहनिर्माण भवन (म्हाडा) खोली क्र. २६४, पहिला मजला, बांद्रे (पुर्व) ४०० ०५१.
७) जिल्हाधिकारी, अमरावती.
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अमरावती.
९) जिल्हा विशेष, लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, अमरावती
१०) अध्यक्ष, वसुंधरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), जि. अमरावती.
११) निवडनस्ती.